**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र.आयटीपी-२००९/(प्र.क्र.१०८)/उद्योग-२
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना** :-

२१ व्या शतकातील माहिती तंत्रज्ञान क्षेत्रास प्राप्त झालेले महत्व व त्यातील जगात भारतास मिळालेले अनन्यसाधारण महत्व लक्षात घेऊन महाराष्ट्र राज्याचे माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२००३ दिनांक ४ जून २००३ रोजी ५ वर्षे कालावधीसाठी घोषित करण्यात आले होते. नवीन माहिती तंत्रज्ञान व मा. तं. सहाय्यभूत सेवा धोरण-२००९ जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

नवीन माहिती तंत्रज्ञान धोरणाचा मसुदा तयार करताना मागील ६ वर्षाच्या कामगिरीचा आढावा घेण्यात आला असून या क्षेत्रातील विकासक, माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील तज्ञ व कंपन्यांचे प्रतिनिधी, नॅसकॉम, टेलिकॉम उद्योगाचे प्रतिनिधी, ॲनिमेशन फिल्म क्षेत्रातील प्रतिनिधी, इतर संबंधित संस्था व यासाठी नेमलेला कार्यबल यांच्याशी विस्तृत चर्चा करण्यात आली आहे.

नॅसकॉमच्या ए टी कीअर्नी अहवालानुसार देशातील ९० टक्के माहिती तंत्रज्ञान - बी.पी.ओ. उद्योग देशातील फक्त ७ शहरांत व त्यांच्या परिसरात - महाराष्ट्रातील मुंबई व पुण्यासह- केंद्रीत झाला आहे. माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात विकासाची मोठ्या प्रमाणात क्षमता असलेली नव्याने उदयास येणारी क्षेत्रे म्हणून औरंगाबाद, नागपूर व नाशिक या शहरांचा उल्लेख अहवालात करण्यात आला आहे. त्यामुळे, या क्षेत्राचा आणखी विकास सबंध राज्यात, विशेषतः कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांमध्ये करण्याचा आणि त्याद्वारे प्रादेशिक वाढीत समतोल राखण्याचा व स्थानिक कौशल्यास तसेच उद्योजकतेस अधिक संधी उपलब्ध करून देण्याचा शासनाचा उद्देश आहे. या प्रयोजनासाठी, महत्त्वाच्या क्षेत्रातील गुंतवणूकांना पाठिंबा चालू ठेवतानाच, मोठी क्षमता असलेल्या शहरा भोवतालच्या माहिती तंत्रज्ञान घटकांना व पायाभूत सोयी-सुविधांना तसेच महाराष्ट्रातील सर्वात जास्त मागास असलेल्या भागांना, या धोरणामध्ये अधिक लाभ प्रस्तावित करण्यात आले आहेत.

माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात सातत्याने व मूल्य-वर्धित वाढ व्हावी तसेच त्याचा प्रसार राज्यातील अन्य भागातही व्हावा यासाठी, या क्षेत्रात काम करणाऱ्यांची कुशलता वाढवणे आणि मोठ्या प्रमाणात प्रशिक्षित लोक उपलब्ध करुन देणे

आवश्यक आहे. यासाठी नवीन धोरणात सार्वजनिक-खाजगी पुढाकारातून क्षमतावाढीस चालना देण्यासाठी नाविन्यपूर्ण उपाय योजनांवर भर देण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

नाशिक, औरंगाबाद व नागपूर या शहरात व सर्वात मागासलेल्या जिल्हयात सातत्याने सुधारणा घडवून आणणे आणि सामाजिक-आर्थिक विकासाचे लोण पोहचविणे, या उद्योगाखाली सर्व-समावेशक वाढीसाठी माहिती तंत्रज्ञान उद्याने विकसित करणे, झपाट्याने वाढणा-या माहिती तंत्रज्ञान उत्पादन व दूरसंचार उद्योगाच्या क्षमतेवर भर देणे याकरिता, माहिती व मा. तं. सहाय्यभूत सेवा धोरणाची सर्व-समावेशक अशी फेर-आखणी करण्यात आली असून महाराष्ट्राचे नविन माहिती तंत्रज्ञान व मा. तं. सहाय्यभूत सेवा धोरण-२००९ या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात येत आहे.

## २. माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २००९

२.१ धोरणाची ठळक उद्दिष्टे

२.१.१ नाशिक, औरंगाबाद, नागपूर आणि कमी मानव-विकास-निर्देशांक जिल्ह्यांचा विकासः

संपूर्ण राज्यात विशेषतः नाशिक, औरंगाबाद, नागपूर आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांमध्ये त्यांची क्षमता वाढविण्याकरिता आणि रोजगार निर्मितीकरिता गुंतवणुका आकर्षित करण्यात येतील.

२.१.२ विशिष्ट क्षेत्रांचा विकासः ए व्ही जी सी ( ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग, आणि कॉमिक्स ) यासारख्या राज्याचे बलस्थान असणा-या विशिष्ट क्षेत्रांच्या विकासाकडे खास लक्ष देण्यात येईल.

२.१.३ ‘हरित माहिती तंत्रज्ञानाचा’ विकासः माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील वाढ पर्यावरण राखणारी असल्याची खात्री जबाबदारीने करण्यात येईल.

२.१.४ उद्योजकता आणि नाविन्यास प्रोत्साहन देणेः ज्ञानाची/स्रोताची केंद्रे आणि इन्क्युबेशन सेंटर्स संपूर्ण राज्यात स्थापन करण्यास प्रोत्साहन देण्यात येईल.

२.१.५ महाराष्ट्र ब्रॅन्ड विकसित करणेः माहिती तंत्रज्ञानात गुंतवणूकीसाठी महाराष्ट्र एक किफायतशीर ठिकाण म्हणून नावारुपास आणण्यात येईल.

## ३. धोरणातील पुढाकार

माहिती तंत्रज्ञान धोरणातील ठळक उद्दिष्टांमुळे राज्यात या क्षेत्राला उपयुक्त पडेल असे कुशल मनुष्यबळ अधिक प्रकाणात विकसित करणे, माहिती

तंत्रज्ञानासाठी विस्तारित पायाभूत सोयी-सुविधा आणि नाविन्य व उद्योजकतेची जोपासना करुन दीर्घ-कालिन मत्ता निर्माण करण्याच्या राज्याच्या प्रयत्नांना एक दिशा मिळणार आहे. ही उद्दिष्टे, विशिष्ट पुढाकार घेऊन आणि प्रोत्साहने देऊन अंमलात आणण्यात येतील.

३. १ सवलती

३.१.१ पायाभूत सोयी-सुविधा आणि आर्थिक लाभ :

१. माहिती तंत्रज्ञान उद्यानांकरिता अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक व अन्य सवलती ः

१) उद्योग संचालनालयाने मान्यता दिलेल्या सार्वजनिक व खाजगी माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा उद्यानांतील सर्व नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान व मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना (दूरसंचार उत्पादन घटकांसह) अधिमूल्य आकारुन किंवा न आकारता, खालीलप्रमाणे १०० टक्के अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक उपलब्ध करुन देण्यात येईल :-

अ) नाशिक, औरंगाबाद व नागपूर जिल्हयात १० टक्के अधिमूल्य आकारुन आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांमध्ये अधिमूल्य न आकारता.

ब) राज्यातील अन्य क्षेत्रात शक्ति प्रदान समितीने निश्चित केल्याप्रमाणे अधिमूल्य आकारुन

२) माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा उद्यानांतील घटकांना उपयोगी पडतील अशा सेवा देण्याकरिता आणि सुयोग्य वातावरण उपलब्ध व्हावे यासाठी मनोरंजन, निवास आणि अन्य सहाय्यभूत सुविधा पुरविणे आवश्यक आहे. या सेवांकरिता वापरण्यात आलेले क्षेत्र खाली नमूद केल्यापेक्षा जास्त नसेल :-

अ) सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ मधील वर्गीकरणानुसार अ आणि ब क्षेत्रात २० टक्के.

ब) नाशिक, औरंगाबाद व नागपूर जिल्हयासह राज्यातील अन्य सर्व क्षेत्रात ४० टक्के.

३) सार्वजनिक आणि खाजगी माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा उद्यानांतील सहाय्यभूत सुविधांकरिता अधिमूल्य आकारुन किंवा न आकारता, खालीलप्रमाणे १०० टक्के अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक उपलब्ध करुन देण्यात येईल :-

अ) नाशिक, औरंगाबाद व नागपूर जिल्हयात १० टक्के अधिमूल्य आकारुन आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांमध्ये अधिमूल्य न आकारता.

ब) राज्याच्या अन्य भागातील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांकरिता, अ आणि ब क्षेत्रात इतर भागांपेक्षा अधिक असलेले अधिमूल्य असेल अशा रितीने शक्तिप्रदान समितीकडून अधिमूल्य निश्चित करण्यात येईल.

४) जेथे संबंध असेल तेथे, ले-आऊट लेव्हलवर ग्लोबल चटई क्षेत्र निर्देशांकास, नगर विकास विभागाच्या मार्गदर्शक सूचनांना अधीन राहून, परवानगी देता येईल.

५) तथापि, मुंबई हे आंतरराष्ट्रीय वित्तीय केंद्र म्हणून विकसित करण्यासाठी होत असलेल्या प्रयत्नांना सहाय्य, पुण्यामध्ये असलेला वाव, वित्तीय सेवांचा माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवांचा माहिती तंत्रज्ञानाशी असलेला संबंध तसेच वित्तीय सेवांमधील रोजगार निर्मितीच्या संधी या सर्व बाबी लक्षात घेऊन मुंबई महानगर प्रदेश आणि पुणे महानगर प्रदेशामध्ये माहिती तंत्रज्ञान उद्यानातील माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवांसाठी किमान ५० टक्के बांधकाम क्षेत्रफळ व पूरक सुविधांसाठी जास्तीत जास्त २० टक्के बांधकाम क्षेत्रफळ वापरण्यात येईल या अटींच्या अधीन राहून निर्धारित वित्तीय सेवांसाठी जास्तीत जास्त ३० टक्के क्षेत्रफळ अनुज्ञेय राहील. मात्र वित्तीय सेवांसाठी वापरण्यात येणाऱ्या अरिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकासाठी लागणारे अधिमुल्य हे माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवांसाठी लागू असलेल्या अधिमुल्यापेक्षा अधिक असेल. तसेच या सेवा संबंधित विकास नियंत्रण नियमावलीच्या विशिष्ट क्षेत्रांच्या अधिन राहतील.

२. माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा उद्यानातील खालील पुरक सुविधा (वाहनतळ वगळून) अनुज्ञेय राहील.

१. बँकिंग सेवा.
२. औषधी दुकाने
३. किरकोळ विक्रीची दुकाने
४. दळणवळण/संपर्क केंद्रे.
५. परिषद व चर्चा-सत्रांसाठी सभागृहे.
६. ट्रॅव्हल एजन्ट
७. कॅफेटेरिआ, फुड कोर्टस, कॉफी शॉप्स इत्यादी सह खाद्य सेवा.

८. दवाखाने.
९. व्यायामशाळा, क्लब हाऊसेस इ. सह मनोरंजनाच्या सुविधा.
१०. विश्रामगृह
११. मोटर वाहनांसाठी सेवा केंद्रे (नाशिक, औरंगाबाद व नागपूर आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांमध्ये)
१२. हॉटेल्स/भाड्यावरील जागांसह राहण्यासाठी चांगल्या सुविधा (नाशिक, औरंगाबाद व नागपूर आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांमध्ये)

३. पात्र माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना सामुहिक प्रोत्साहन योजनेतील तरतुदींनुसार विद्युत शुल्क अदा करण्यातून सूट देण्यात येईल.

४. माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या वीज दराच्या आदेशाच्या अधिन राहून औद्योगिक दराने वीज पुरवठा करण्यात येईल.

५. माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना मुद्रांक शुल्कात खालीलप्रमाणे सूट अनुज्ञेय राहील :-

१. सी, डी, डी+, ना-उद्योग जिल्हे आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्हा क्षेत्रातील नविन व विस्तारित नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना तारणगहाण, हडप, तारण, हक्कलेख निक्षेप, अभिहस्तांतरण पत्र, गहाण मालमत्तेवरील प्रभार, भाडेपट्टा, गहाणखत आणि प्रतिभूति-बंधपत्र या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल.

२. अ व ब प्रवर्ग क्षेत्रामध्ये येणा-या सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील, माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रांतील, माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर विशेष आर्थिक क्षेत्रांतील आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन विशेष आर्थिक क्षेत्रांतील नविन व विस्तारित नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र आणि भाडेपट्टा या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल :-

३. अ व ब प्रवर्ग क्षेत्रामध्ये येणाऱ्या खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील नविन व विस्तारित नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना, (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर व दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह) तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र,

भाडेपट्टा आणि सार्वजनिक अभिहस्तांकित भाडेपट्टा या व्यवहारांकरीता, मुद्रांक शुल्कात ७५ टक्के सूट देण्यात येईल.

४. राज्यातील नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना, त्यांचे विलीनीकरण/विभक्त किंवा फेररचना झाल्यास, मुद्रांक शुल्कात ९० टक्के सूट देण्यात येईल.

५. मुंबई मुद्रांक अधिनियम १९५८ च्या कलम ६० खाली नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांच्या अभिहस्तांकित भाडेपट्ट्यांना आणि कलम ३६-ए खाली माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांच्या संमती व परवानगी (अनुज्ञा) करारनाम्यांना मुद्रांक शुल्कात ९० टक्के सूट देण्यात येईल.

६. अपवादात्मक बाबी वगळता माहिती तंत्रज्ञान उत्पादनावरील कार्यसंवेदा कर सर्वसाधारणपणे केंद्रिय पातळीवरील संबंधीत शक्ती प्रदत्त समितीने शिफारस केलेल्या किमान दरानुसार आकारण्यात येईल.

७. माहिती तंत्रज्ञान/मा.तं. सहाय्यभूत सेवा घटकांना जकात/प्रवेश कर किंवा त्यांच्याऐवजी लावलेल्या अन्य उपकरातून किंवा करातून सूट देण्यात येईल.

८. माहिती तंत्रज्ञान/मा.तं. सहाय्यभूत सेवा घटकांना लागू असलेल्या अधिकारितेच्या निकषानुसार निवासी दराने मालमत्ता कर आकारण्यात येईल.

९. माहिती तंत्रज्ञान/मा.तं. सहाय्यभूत सेवा घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादक घटक वगळून) कोणत्याही क्षेत्रात (रहिवासी, ना विकास क्षेत्रासह ) उभारण्यास परवानगी देण्यात येईल.

१०. महामार्गांना जोडण्यासाठी उच्च प्रतीचे रस्ते बांधण्याकरीता, राज्य शासन आणि नागरी स्थानिक संस्थांनी केलेल्या गुंतवणुकींना पुरक गुंतवणूक करण्यास, खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांच्या विकासकांना परवानगी देण्यात येईल. नागरी स्थानिक संस्थांना असे रस्ते विकासकांकडून हस्तांतरित करण्यात येतील आणि अशा गुंतवणुकांचे भविष्यात, विकासकांनी स्थानिक संस्थांना देय असलेल्या मालमत्ता करांत, समायोजन करण्यात येईल.

११. अपवादात्मक बाबी वगळता माहिती तंत्रज्ञान उत्पादनावरील मुल्यवर्धित कर सर्व साधारणपणे केंद्रिय पातळीवरील संबंधीत शक्ती प्रदत्त समितीने शिफारस केलेल्या किमान दरानुसार आकारण्यात येईल.

### ३.१.२ मनुष्यबळ विकास

१. माहिती तंत्रज्ञान उद्योगाकरिता, विशेषतः उच्च क्षमता असणा-या नवीन क्षेत्रांत आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्हांत, मनुष्य बळाचा विकास करण्यावर विशेष भर देण्यात येईल.

२. महाराष्ट्र नॉलेज कॉर्पोरेशन लिमिटेड, महाराष्ट्र राज्य तांत्रिक शिक्षण मंडळ आणि अन्य संस्था रोजगार मिळवून देणारे कार्यक्रम सुरु करतील आणि अशा कार्यक्रमाचे प्रमाणीकरण करतील. या संस्था नॅसकॉम व अन्य संबंधित संघटनांच्या तसेच स्थानिक उद्योगाबरोबर चर्चा करतील आणि या क्षेत्रातील गरजा समजून घेतील. या गरजांवर आधारित, प्रमाणिकरणाकरिता आणि याद्वारे रोजगार उपलब्ध करुन देण्याकरिता सुनियोजित कार्यपध्दती ठरविण्यात येईल, ज्यामुळे उद्योगाकरिता योग्य असे मनुष्यबळ तयार होईल. जे लहान माहिती तंत्रज्ञान घटक आवश्यक अंतर्गत प्रशिक्षण स्वतःहून दण्यास सक्षम नाहीत, त्यांच्या दृष्टीने हे खास करुन महत्त्वाचे आहे.

३. कमी मानव विकास निर्देशांक असलेल्या जिल्हयामध्ये संशोधन व विकास केंद्र, फिनिशिंग स्कूल यासारख्या रोजगाराभिमूख प्रशिक्षण केंद्र, सेंटर ऑफ एक्सलन्स (माहिती तंत्रज्ञान) संस्थापन करण्यासाठी सुसाध्यता व तपशीलाबाबत शक्ति प्रदान समिती अंतर्गत मनुष्यबळ विकासाशी संबधीत कार्यबळ समिती मार्फत अभ्यास होऊन प्रस्ताव तयार करण्यात येईल.

### ३.१.३ कायद्यांच्या संबंधात पुढाकार

१ माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना खालील बाबींसंदर्भांत फायदे मिळणे चालू राहतीलः-

१) कामाचे तास, कामाच्या पाळया आणि महिला कर्मचा-यांच्या नेमणुकांच्या संदर्भातील दुकाने व आस्थापना अधिनियमातील तरतूदीत शिथिलता.

२) प्रत्यक्ष हजेरी आणि वेतनविषयक नोंद-वह्या ठेवण्यातून सूट.

३) कामगार विभागातर्फे अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या १३ अधिनियमांखालील वार्षिक विवरणपत्रे स्व-प्रमाणित आणि एकत्रित दाखल करण्याचा पर्याय.

२. माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांनी विविध कामगार कायद्यांखाली ठेवावयाचे कर्मचारी-संबंधातील अभिलेखे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात ठेवण्याची आणि कामगार विभागाच्या संगणकीकरणाच्या प्रगतीला अनुसरुन विवरणपत्रे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात स्वीकारण्याची तरतूद करण्यात येईल.

३. माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटक उत्पादन प्रक्रियेतून निःस्त्रुत पाणी निर्माण करीत नाहीत व अशा घटकांमध्ये १०० पेक्षा कमी कर्मचारी आहेत त्यांना महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडून परवाना घेण्यापासून सूट असेल. अशा उद्योग घटकाने इलेक्ट्रॉनिक टाकाऊ वस्तू, वापरलेल्या बॅटरी, वापरलेले तेल यासह विविध टाकाऊ पदार्थांचे वार्षिक विवरणपत्र तयार करुन महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळास सादर करावयाचे आहे. उद्योग विभागामार्फत अशा घटकांचे नोंदणीकरण या विशिष्ट अटी घालून करण्यात येईल. अशा एकाकी उद्योग घटकांनी स्थानिक सांडपाणी प्रक्रिया यंत्रणेसोबत सहभागी होणे आवश्यक राहील.

४. विशेष आर्थिक क्षेत्रातील घटकांकरीता कंत्राटी कामगार अधिनियमात मंजूर केलेल्या शिथीलता, विधी मंडळाच्या संमतीस अधीन राहून, माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांच्या बाबतीत देखील विचारात घेण्यात येतील.

५. माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर व दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटक वगळून) घटकांना, वीज पुरवठ्याच्या प्रयोजनाकरिता, अखंडित प्रक्रिया घटक म्हणून मानण्यात येईल.

३.२ विशिष्ट क्षेत्रांचा विकास (ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्टस्, गेमिंग आणि कॉमिक्स)

१) माहिती तंत्रज्ञान घटकांना या धोरणाखाली देण्यात आलेले सर्व लाभ मिळण्यास एव्हीजीसी घटक पात्र राहतील.

२) राज्यात एव्हीजीसी क्षेत्रासाठी सामयीक सुविधा इत्यादि करीता केंद्रांची स्थापना करण्यास शासन पाठिंबा देईल. एव्हीजीसी केंद्र एक एकात्मिक सुविधा असेल ज्यामध्ये निर्मिती सुविधा, एव्हीजीसी स्टुडिओ, परफॉर्मिंग आर्टसाठी जागा, प्रदर्शनासाठी गॅलरी आणि कलाकारांना काम करण्यासाठी जागेच्या सुविधा असतील. एव्हीजीसी केंद्राकरिता पायाभूत सोयी-सुविधांच्या गरजा, उत्पन्न व कामकाजाचा आराखडा (पीपीपी सारखे), ठिकाण इ. कार्यबल समिती या क्षेत्रातील उद्योगतज्ञांशी विचार-विनिमय करुन निश्चित करेल.

३) विद्यापीठे, उद्योग आणि महाराष्ट्र नॉलेज कॉर्पोरेशन लिमिटेड, एम एस बी टी ई यासारख्या संस्थांच्या सहकार्यातून एव्हीजीसी उद्योगातील व्यावसायिक विकसित करण्यात येतील.

४) महाराष्ट्रातील एव्हीजीसी या क्षेत्राशी संबंधित आंतरराष्ट्रीय कार्यक्रमांना पाठिंबा देण्यात येईल.

३.३ नाशिक, औरंगाबाद व नागपूर आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांचा विकास

१) वरील क्षेत्रांत माहिती तंत्रज्ञान उद्याने स्थापण्याकरिता, या धोरणात अन्यत्र नमूद केल्याप्रमाणे, अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक व अन्य लाभ देण्यात येतील. या धोरणातील अन्य कलमांद्वारे मनुष्य बळ विकासाला आणि अन्य गरजांना वरील क्षेत्रांत पाठिंबा देण्यात आला आहे.

२) कमी मानव विकास निर्देशांक असलेल्या जिल्हयांमध्ये महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ क्षेत्रात माहिती तंत्रज्ञान घटक स्थापन करण्याकरिता प्रचलित दराच्या २५ टक्के दराने जागा देण्यात येईल.

३) कमी मानव विकास निर्देशांक असलेल्या जिल्हयांमध्ये स्थापना करणा-या आणि सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ मधील निकषानुसार स्थानिक लोकांना रोजगार देणा-या नवीन माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना, त्यांनी कामगार विमा योजनेखाली (इ.एस.आय.) आणि कामगार भविष्य-निर्वाह निधीत (इ.पी.एफ.) भरणा करावयाच्या वर्गणीवरील खर्चाच्या ७५ टक्के प्रतीपूर्ती ५ वर्षाच्या कालावधीकरिता करण्यात येईल. तथापि, हे लाभ एकूण भांडवली गुंतवणूकीच्या २५ टक्क्यांपर्यंत मर्यादित राहतील. इ.एस.आय. आणि इ.पी.एफ. मधील देय वर्गणीची रक्कम घटकाने नियत दिनांकाला अदा केली असल्याच्या अटीवर, किमान सांविधिक मर्यादेवर आधारित प्रतीपूर्तीची रक्कम वार्षिक तत्त्वावर देण्यात येईल.

४) नाशिक, औरंगाबाद व नागपूर शहरांच्या इंटरनेट पोर्टल्सचे समाणीकरण करण्यात येऊन त्याद्वारे, खाजगी आणि सार्वजनिक सामाजिक आणि अन्य पायाभूत सोयी-सुविधा, राज्य शासनाचे आणि स्थानिक पुढाकार, यासह अधिक सर्वसमावेशक माहिती देण्यात येईल.

५) या धोरणाखालील विविध लाभांच्या प्रयोजनांकरिता, नाशिक, औरंगाबाद व नागपूर ला करण्यात आलेल्या संदर्भामध्ये संपूर्ण जिल्ह्याचा समावेश होतो.

३.४. <u>'हरित माहिती तंत्रज्ञानाचा' विकास</u>

१. नैसर्गिक स्रोताचे व्यवस्थापन कार्यक्षमरित्या करणा-या माहिती तंत्रज्ञान घटकांकरिता पुरस्कार सुरु करण्यात येतील.

२. ई-कचरा गोळा करण्याच्या पध्दतीचा आणि पुनरुत्पादन संयंत्रांचा परिपूर्ण विकास करण्यास आणि शासकीय तसेच खाजगी संस्थांनी वापरलेल्या माहिती तंत्रज्ञान उत्पादनांची विल्हेवाट लावण्यासाठी त्याचा उपयोग करण्यास चालना देण्यात येईल.

३. उत्पादनाचा कार्यकाल संपल्यावर ही उत्पादने मागे घेण्याचे निश्चित धोरण असणा-या आणि ई-कच-याकरिता पुनरुत्पादन प्रक्रिया वापरणा-या घटकांना, माहिती तंत्रज्ञान उत्पादने खरेदी करताना शासन प्राधान्य देईल.

४. राज्य शासनाचे विभाग आणि संस्था त्यांची खरेदी करताना हरित व ऊर्जा कार्यक्षम असलेल्या माहिती तंत्रज्ञान उत्पादनांना प्राधान्य देतील.

५. या व्यतिरिक्त हरित माहिती तंत्रज्ञान उद्योगांना तसेच त्यातील घटकांना सुलभरित्या पर्यावरणाशी संबधीत परवानगी व इतर सवलती मिळविण्याकरिता पर्यावरण विभागाशी विचार विनिमय करून शक्ती प्रदान समितीच्या मान्यतेने निकष ठरविण्यात येतील.

३.५ उद्योजकता आणि नाविन्यास प्रोत्साहन देणेः

१) विविध शैक्षणिक संस्था व संशोधन संस्था आणि माहिती तंत्रज्ञान उद्योग, यांच्यात ज्ञान स्रोतांची देवाण-घेवाण व प्रसार होण्यासाठी एक सामाईक व्यासपीठ उभारणे आणि लहान उद्योगांकरिता इनक्युबेशन सेंटरची स्थापना करणे, शासन सुलभ करेल असे व्यासपीठ उभारण्यासाठी आणि एम्बेडेड सॉफ्टवेअर, चिप तंत्रज्ञान, दूरसंचार तंत्रज्ञान यासारख्या माहिती व दूरसंचार तंत्रज्ञानाकरिता सबंध राज्यात इन्क्युबेशन सेंटर्सची स्थापना करण्याकरिता शक्ती प्रदान समिती एक मॉडेल व चौकट निश्चित करेल.

२) नवीन घटकांना सक्षम करण्यासाठी इनक्युबेशनच्या सुविधा देण्याकरिता नवीन माहिती तंत्रज्ञान उद्यानांना त्यांच्या बांधकाम क्षेत्राच्या ५ टक्के क्षेत्र ठेवावे लागेल. उद्यानाचे हे क्षेत्र माहिती तंत्रज्ञानाच्या कार्याकरिता वापरावयाच्या क्षेत्राचा एक भाग म्हणून मानण्यात येईल व तो त्यानुसार अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक मिळण्यास पात्र राहील.

३) सामुहिक प्रोत्साहन योजनेखाली समाविष्ट असणा-या सुक्ष्म, लहान व मध्यम माहिती तंत्रज्ञान घटकांना पेटंट दाखल करण्यावरील ५० टक्के खर्चाची जास्तीत जास्त रु.५ लाख, प्रतिपूर्ती करण्यात येईल.

३.६ महाराष्ट्र ब्रॅन्ड विकसित करणे

१) सर्वसाधारणपणे माहिती तंत्रज्ञान क्षेत्राशी आणि विशेषतः एव्हीजीसी शी संबंधित असणा-या आंतर-राष्ट्रीय व देश-पातळीवरील व्यावसायिक परिसंवाद, प्रदर्शन इत्यादी कार्यक्रमांच्या महाराष्ट्रातील आयोजनास शासन पाठिंबा देईल.

२) दोनपेक्षा अधिक लेव्हलवरील सीएमएम, आयएसओ २७००१ सुरक्षेसाठी आणि सीओपीसी व ईएससीएम प्रमाणपत्रांसाठी झालेल्या खर्चापैकी ५० टक्के खर्चाची प्रतिपूर्ती, जास्तीत जास्त रुपये ५ लाख, सामुहिक प्रोत्साहन योजनेतील सुक्ष्म व लघु-स्तरावरील माहिती तंत्रज्ञान घटकांना करण्यात येईल.

३) दर वर्षी २० ऑगस्ट हा दिवस राज्याचा माहिती तंत्रज्ञान दिन म्हणून यापुढेही साजरा करण्यात येईल. जेव्हा उत्कृष्ट योगदान देणा-या व कामगिरी करणा-या माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवेच्या घटकांना पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

३.७ प्रशासकीय उपाय योजनाः-

१) केबल्स टाकण्यासाठी परवानगी आणि टॉवर्स व ॲन्टीना उभारण्यासाठी परवानगीकरिता राईट ऑफ वे चा अर्ज, विहीत नमुन्यात असल्यास व तसेच त्या सोबत आवश्यक कागदपत्रे जोडलेली असल्यास, ३० दिवसांत मंजूर करण्यात येईल.

२) ई-शासनाकरिता विविध प्रकारचे पुढाकार राज्य शासनाने मागील काही वर्षात घेतले आहेत. त्यांचा मोठया प्रमाणावर स्वीकार व्हावा यासाठी ई-शासनासंबंधातील सर्व पुढाकार व्दि-भाषिक (मराठी व इंग्रजीत) असावेत.

३) कोठेही वापरता येणे शक्य व्हावे यासाठी मराठी भाषेतील फॉन्टसच्या सॉफ्टवेअरचे प्रमाणीकरण करण्यासाठी पुढाकार घेण्यात येईल.

४) शासकीय कार्यालयांचा दस्तऐवज कुठल्याही संगणकावर वाचता येईल व भविष्यात व्यवस्थित जतन करता येतील, यासाठी शासकीय कार्यालयांमध्ये युनीकोडचा वापर करण्यात येईल.

## ४. धोरण अंमलबजावणीसाठी व्यवस्थापनाची चौकट

४.१ शक्ति प्रदान समिती :- राज्य स्तरावरील शक्ति प्रदान समिती धोरणाच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण करेल आणि आवश्यक तेथे कार्यपध्दती व नियमावली तयार करेल. शक्ति प्रदान समितीचे गठण खालीलप्रमाणे असेल :-

१. मुख्य सचिव- अध्यक्ष
२. प्रधान सचिव (वित्त)- सदस्य
३. प्रधान सचिव (उद्योग)- सदस्य
४. प्रधान सचिव (नगर विकास-१) - सदस्य
५. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण)- सदस्य
६. प्रधान सचिव (नियोजन) - सदस्य
७. सचिव (माहिती तंत्रज्ञान)- सदस्य
८. सचिव (नगर विकास-२) - सदस्य
९. एसटीपीआय संचालक- सदस्य
१०. नॅसकॉमची नामनिर्देशीत व्यक्ति - सदस्य
११. मॅन्युफॅक्चरर्स असोसिएशन ऑफ आयटीची नामनिर्देशीत व्यक्ति- सदस्य
१२. विकास आयुक्त (उद्योग) - सदस्य सचिव

शक्ति प्रदान समिती कोणतेही विभाग/संघटनेचे प्रतिनिधी अथवा व्यक्तींना आवश्यक्तेनुसार बैठकीसाठी निमंत्रित करेल.

४.२ शक्ति प्रदान समितीची सनद :-

१) धोरणातील खालील बाबींची अंमलबजावणी करण्याकरिता व समन्वय ठेवण्याकरिता शक्ति प्रदान समिती एक कार्यबळ समिती स्थापन करेल :-
   - मनुष्यबळ विकास
   - विशिष्ट क्षेत्रांचा विकास : एव्हीजीसी उद्योग
   - नाशिक, औरंगाबाद व नागपूर आणि कमी मानव-विकास-निर्देशांक असलेल्या जिल्ह्यांचा विकास
   - हरित माहिती तंत्रज्ञनाचा विकास
   - उद्योजकता आणि नाविन्यता
   - महाराष्ट्र ब्रॅंडचा विकास

२) शासन निर्णय/अधिसूचना यातील संबंधित सर्व सुधारणा वेळेवर प्रसिध्द होतील याची खात्री करणे आणि त्यांचे संनियंत्रण करणे.

३) कार्यबळ समितीने अंमलबजावणीसाठी प्रस्तावित केलेल्या चौकटी/ कार्यपध्दतींना मान्यता देणे.

४) कार्यबळ समितीने प्रस्तावित केलेल्या प्रत्येक पुढाकाराकरिता कालमर्यादा आणि लक्ष्यांक निश्चित करणे.

५) या धोरणाशी संबंधित बाबींसंदर्भात आंतरविभागीय समन्वय साधणे.

६) धोरणातील महत्त्वाच्या बाबींसंदर्भातील सांख्यिकी माहितीच्या आधारावर धोरणाच्या अंमलबजावणीचे परिणामकारक विश्लेषण आणि मूल्यमापन करणे.

७) हरित माहिती तंत्रज्ञान उद्यानांना तसेच त्यातील घटकांना सुलभरित्या पर्यावरणाशी संबधीत परवानगी व इतर सवलती मिळविण्याकरिता पर्यावरण विभागाशी विचार विनिमय करून निकष ठरविणे.

८) सर्व स्तरांवर असलेले अंमलबजावणीबाबतचे प्रश्न सोडविणे.

९) माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा तसेच वित्तीय सेवांची यादी आणि माहिती तंत्रज्ञान उद्यानात अनुज्ञेय पुरक सुविधांच्या यादीचा आढावा घेणे व त्यात योग्यतेनुसार सुधारणा करणे.

१०) या धोरणात नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या आधारे अतिरिक्त चटई क्षेत्राकरिता अधिमूल्य आणि अन्य अटी व शर्ती निश्चित करणे आणि या संबंधात स्थानिक स्वराज्य संस्था आणि महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ सारख्या सार्वजनिक संस्था व विशेष नियोजन प्राधिकरण पाळत असलेल्या प्रथांशी मेळ घालणे.

११) सर्वात चांगल्या प्रथा (बेस्ट प्रॅक्टीसेस) चा आढावा घेणे.

## ५. व्याख्या

५.१ या धोरणाच्या संदर्भात, माहिती तंत्रज्ञान उद्योगांत खाली व्याख्या केल्याप्रमाणे माहिती तंत्रज्ञान सॉफ्टवेअर, माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर, आणि मा. तं. सहाय्यभूत सेवा यांचा समावेश होतो.

अ) माहिती तंत्रज्ञान सॉफ्टवेअर : माहिती तंत्रज्ञान सॉफ्टवेअर म्हणजे स्रोत संकेतांक किंवा वस्तु संकेतांकासह सूचना, माहिती, ध्वनी किंवा प्रतिमा यांचे कोणतेही अभिवेदन, ज्यात वरील बाबीची नोंद यंत्राने वाचण्या-योग्य स्वरुपात करण्यात आली आहे आणि ज्यात उपयोगकर्त्यास कोणतेही परस्पर संस्करण संगणकाच्या माध्यमातून करता यावे म्हणून त्यांत बदल करता येणे शक्य असते.

ब) माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर : माहिती तंत्रज्ञान हार्डवेअरमध्ये उद्योग संचालनालयाने वेळोवेळी अधिसूचित केलेल्या उत्पादनांचा समावेश असेल. त्यांची ढोबळ यादी परिशिष्ट- १ मध्ये देण्यात आली आहे.

क) माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा : मा. तं. सहाय्यभूत सेवांच्या व्याखेमध्ये वेब सहाय्यभूत, विक्री योग्य खालील सेवांचा समावेश होतोः-

- डेटा कन्व्हर्जन, डेटा माईनिग, डिजिटलायझेशन, डेटा ऐन्ट्री, डेटा प्रोसेसिंग, डेटा वेअरहाउसिंग.
- डिजिटलायझेशन ऑफ स्पोकन मटिरिअल.
- कंप्युटर अेडेड डिझाईन/कॅड/कॅम सर्विसेस
- वैद्यकीय प्रतिलेखन (मेडिकल ट्रान्सक्रिप्शन)
- विधिविषयक माहितीचे संस्करण
- डिजिट्ल कंटेंट डेव्हलपमेंट
- माहिती सेवा
- सॉफ्टवेअर देखभाल सेवा
- माहिती तंत्रज्ञान सिस्टिम ऑडीट सेवा
- माहिती तंत्रज्ञान सुरक्षा आणि जोखीम व्यवस्थापन सेवा
- आय टी सोल्युशन प्रोव्हाइडर्स/इंप्लिमेंटर्स (सर्व्हर डेटा बँक्स, ॲप्लिकेशन सर्व्हिस प्रोव्हाइडर्स, इंटरनेट/वेब बेस्ड ई-कॉमर्स सर्व्हिस प्रोव्हाइडर्स, स्मार्ट कार्ड कस्टमायझेशन सर्व्हिस प्रोवाइडर्स, सिस्टीम इंटिग्रेशन सर्व्हिस प्रोव्हाइडस, यासह )
- वेब-साईट सेवा, वेब डिझाईनिंग आणि वेब कंटेंट डेव्हलपमेंट सेवा.
- बी. पी. ओ. (कॉल सेंटर सेवांसह)
- ए व्ही जी सी ( ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग ॲन्ड कॉमिक्स), आणि
- संगणकाचा प्रकर्षाने वापर करुन पुरविण्यात येणा-या इतर सेवा
  (टेली मेडिसिन सर्व्हिसेस, रिमोट ॲक्सेस, सायबर कॅफे, कियोक्स, व्हिडिओ कॉन्फरन्स सेंटर, रिमोट डायग्नोस्टिक ॲन्ड रिपेअर सर्व्हिसेस यासह ).

मा. तं. सहाय्यभूत सेवांची यादी उद्योग संचालनालयाकडून, शक्ति प्रदान करण्यात आलेल्या समितीच्या पूर्व-संमतीने, वेळोवेळी अद्यावत करण्यात येईल.

माहिती तंत्रज्ञान घटकांच्या व्याखेमध्ये माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूर संचार हार्डवेअर उत्पादक घटक, मा. तं. सहाय्यभूत सेवा (आयटीईएस) आणि सॉफ्टवेअर उद्योगांचा सेवांसह समावेश होतो.

५.२ कमी मानव-विकास-निर्देशांक जिल्हयांमध्ये सामुहिक प्रोत्साहन योजना २००७ मध्ये उल्लेखलेल्या खालील १० जिल्हयांचा समावेश असेल.

- गडचिरोली
- यवतमाळ
- जालना
- नंदुरबार
- वाशिम
- धुळे
- नांदेड
- उस्मानाबाद
- बुलढाणा
- चंद्रपूर

**६. कालावधी :-** माहिती तंत्रज्ञान व मा. तं. सहाय्यभूत सेवा धोरण २००३ या शासन निर्णयाच्या दिनांकापासून संपूष्टात येत असून नवीन माहिती तंत्रज्ञान व मा. तं. सहाय्यभूत सेवा धोरण २००९ लागू करण्यात येत आहे व या धोरणाचा कालावधी दि.१४ ऑगस्ट, २०१४ पर्यंत राहिल.

७. या शासन निर्णयानुसार सर्व संबंधीत विभागांनी आवश्यक ते आदेश/अधिसुचना त्वरीत निर्गमित कराव्यात.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८२९१२२३०२००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( ए.एम.खान )
प्रधान सचिव (उद्योग)

प्रति,

१. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (मदतकार्य व पुर्नवसन) महसूल पुर्नवसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. प्रधान सचिव, नगर विकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, नगर विकास विभाग-२, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१३. महानगरपालिका आयुक्त, महानगर पालिका (सर्व)
१४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई.
१५. व्यवस्थापक संचालक, सिडको, मुंबई.
१६. विभागीय आयुक्त, पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती/मुंबई.
१७. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१८. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
२०. महानिरीक्षक, नोंदणी व नियंत्रक, मुद्रांक शुल्क, पुणे.
२१. निमंत्रक, उद्योग मित्र, मुंबई.
२२. उद्योग सह संचालक (माहिती तंत्रज्ञान), उद्योग संचालनालय, मुंबई.
२३. संचालक, सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी पार्क्स ऑफ इंडिया, मुंबई/पुणे.
२४. उप महानिरीक्षक, मुंद्रांक शुल्क, मुंबई.
२५. उद्योग विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/कक्ष अधिकारी.
२६. कक्ष अधिकारी (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२८. निवड नस्ती (उद्योग-२) निवड नस्ती (उद्योग-२), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

## APPENDIX-I PRIMARY PRODUCTS (IT Hardware)

| Sr.No. | H.S.No. | | Description of products |
|---|---|---|---|
| 1 | 85.23 | 11) | Magnetic tapes of a width not exceeding 4 m.m. |
| | | 12) | Magnetic tapes of a width exceeding 4 m.m. but not exceeding 6.5. m.m. |
| | | 13) | Magnetic tapes of a width exceeding 6.5 m.m. |
| | | 20) | Magnetic discs |
| | | 90) | Other |
| 2 | 85.31 | | Electrical capacitors, fixed, variables or adjustable (Preset) |
| | | 10) | Fixed capacitors designed for use on 50/60 HZ Circuits and having a reactive power h. capacity of not less than 0.5 kvar (Power capacitors) |
| | | 21) | Tantalum fixed capacitors |
| | | 22) | Aluminum electrolytic fixed capacitors |
| | | 23) | Ceramic dielectric, single laxer fixed capacitors |
| | | 24) | Ceramic dielectric, multilayer fixed capacitors |
| | | 25) | Dielectric fixed capacitors of paper or plastic |
| | | 29) | Other fixed capacitors |
| | | 30) | Variable or adjustable (Pre-set) capacitors |
| | | 90) | Other |
| 3 | 85.33 | | Electrical resisters (including rheostats and potentiometer) other than leading resisters. |
| | | 10) | Fixed carbon resisters, composition or film types |
| | | 21) | Other fixed resisters for a power handling capacity not exceeding 20 w. |
| | | 30) | Wire wound variable resistors including rheostats and potentiometers for a power handling not exceeding 20 W. |
| | | 39) | Wire wound variable resitors including rheostats and potentiometers for a power handling exceeding 20 w or more |
| | | 40) | Other variable resistors, including rheostats and potentiometers |
| | | 90) | Parts |
| 4 | 85.36 | 50) | Electronic AC switches consisting of optically coupled input and output circuits.(AC Switches) |
| | | 50) | Electronic switches including temperature protected electronic switches consisting of and a logic chip (Chip on Chip technology) for a voltage not exceeding 1000 volts |
| | | 50) | Electromechanically snafaction switches for a current not exceeding 11 amps. |
| | | 69) | Plugs and Sockets for co-axial cables and printed circuits. |
| | | 90) | Connection and contact elements for Wires and Cables |
| 5 | 85.41 | | Diodes, transistors and similar semiconductor devices, photosensitive semi-conductor, including photo voltaic cells whether or not assembled in modules or made up into panel light emitting diodes, mounted piezo electric crystals. |
| | | 10) | Diodes, other than photosensitive or light emitting liodes. |
| | | 22) | Transistors other than photosensitive transistors with a dissipation rule of less than 1 w. |
| | | 29) | Transistors other than photosensitive transistors, with a |

| Sr.No. | H.S.No. | Description of products | |
|---|---|---|---|
| | | | dissipation rule of 1 w. or more. |
| | | 30) | Thysistors diacs and triacs other than photosensitive devices |
| | | 40) | Photosensitive semiconductor devices, including photo voltaic cells whether or not as modules or made up into panels, light emitting diodes. |
| | | 50) | Other semi conductor devices |
| | | 60) | Pountaged piezo-electric crystals. |
| | | 90 | Parts |
| 6 | 85.42 | 12) | Electronic integrated circuits and micro assembles. Cards incorporating an electronic integrated circuit (Smart Cards) |
| | | 13) | Metal oxide semiconductors (Mos Technology) |
| | | 14) | Circuits obtained by bipolar technology. |
| | | 19) | Other monholithic integrated circuits, including circuits obtained by a combination and Mos Technology (Bionos technology) |
| | | 31) | Other monolithic integrated circuits |
| | | 40) | Hybrid integrated circuits |
| | | 41) | Electronic Micro assemblies |
| | | 90) | Parts |
| 7 | 85.44 | 41) | Other electric conductors for a voltage not exceeding 80 V, fitted with connectors of for telecommunication |
| | | 49) | Other electric conductors for a voltage not exceeding 80 V, fitted with connectors of for telecommunication |
| | | 50) | Other electric conductors for a voltage exceeding 80 V but not exceeding 1000 V, fitted with connectors of a kind used for telecommunication |
| | | 70) | Optical fiber cables |

H-1262-135

**APPENDIX-I (A)**
**PRIORITY INTERMEDIATE PRODUCTS**

1. Input – Output Units including All computer peripherals: HSN 8471.60
2. Computer Keyboard: HSN 8471.60.10
3. Computer Monitors: HSN 8471.60.19.20 HSN: 8471.90.07
4. Populated PCB'SSI (All Categories): HSN 8473.10 HSN 8473.30 HSN 8473.40 HSN 8473.90 HSN 8473.90 HSN 8473.90 HSN 8473.90 HSN 8473.90
5. Smart Cards & Accessories: HSN 8542.12
6. UPS for Data Processing HSN 8504.40 Equipment: HSN 8543.80 HSN 8471.05
7. Set-up box with communication function and accessories: HSN 8517.80
8. Internet – Box with user interface and network interface: HSN 8517.80
9. Modems and ISIN Terminals: HSN 8517.50
10. Router & Technical Services: HSN 8517.50
11. VSAT Terminals: HSN 8525.20
12. Radio Communication
13. Equipment: HSN 8525.20
14. Electronic Private Automatic Branch Exchange. (EPABX)
15. Digital Image Recorders (HSN No. 9010).
16. Adapters, Jacks & Plugs, Relays, Switches, Terminals & terminal blocks, Sockets, Heat Sinks, Bases and Folders useful for electronics equipments only (HSN No. 8335).
17. Video Conferencing Equipments.
18. Mobile Handsets (GPRS & CDMA) (HSN No. 8413).
19. 84.69 Word Processing Machines & Electronic Typewriters.
20. 84.70 Electronics Calculators.
21. 84.71 Computer Systems & Peripherals, Electronic Diaries.
22. 84.73 Parts & Accessories of HSN 84.69, 84.70 & 84.71 for items listed above.
23. 85.01 DC Micro Motors / Stepper motors of an output not exceeding 37.5 Watts.
24. 85.03 Parts of HSN 85.01 for items listed above.
25. 85.04 Uninterrupted Power Supplies (UPS) and their parts.
26. 85.05 Permanent magnets and articles intended to become permanent magnets (Ferrites).
27. 85.17 Electrical apparatus for the Telephony or line telegraphy, including linetelephone sets with cordless handsets and telecommunication apparatus for carries-current line systems or for digital line systems; videophones.
28. 85.18 Microphones, Multimedia Speakers, Headphones, Earphones & Combined Microphones / Speaker Sets & their parts.
29. 85.20 Telephone Answering Machines.
30. 85.22 Parts of Telephone Answering Machines.
31. 85.23 Prepared unrecorded Media for Sound Recording or Similar Recording of other phenomena.
32. 85.24 IT Software on any Media.
33. 85.25 Transmission apparatus other than apparatus for radio broadcasting or TV broadcasting, transmission apparatus incorporating reception apparatus, digital still image video cameras.
34. 85.27 Radio communication receivers, Radio pagers.
35. 85.29 (i) Aerials, Antennas and theirs parts.
    (ii) Parts of Items at 85.25 and 85.27 listed above.

36\. 85.31 LCD Panels, LED Panels & Parts thereof.

38\. 85.32 Electrical Capacitors, Fixed, Variable or adjustable (Pre-set) and parts thereof.

39\. 85.34 Printed Circuits.

40\. 85.36 Switches, Connectors & Relays for upto 5 Amps at voltage not exceeding 250 Volts, Electronics Fuses.

40\. 85.40 Data / Graphic Display Tubes, other than TV pictures tubes and parts thereof.

41 85.43 Signal Generators and parts thereof.

42\. 90.01 Optical Fiber and Optical Fiber Bundles and Cables.

43\. 90.13 Liquid Crystal Devices, Flat Panel display devices and parts thereof.

44\. 90.30 Cathode ray oscilloscopes, Spectrum Anlysers, Cross-talk meters, Gain measuring instruments, distortion factor meters, Psophometers, Network & Logic analyser and Signal analyzer